**ज्येष्ठता सूची**

**संचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१.०१.२०२४ पर्यतची तात्पुरती ज्येष्ठता सूची.**

महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः मावज-२०२४ /प्र.क्र. २३ /मावज-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २९ मे, २०२४

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०११/ प्र.क्र.२८४/का.-१२, दि. २१.१०.२०११
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्रमांकः बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६-ब, दि.२९.१२.२०१७.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः मावज-२०२३/३२४/प्र.क्र.३६ /३४-अ, दि.०४.०९.२०२३.

**शासन परिपत्रक :-**

शासन सेवेतील अधिकारी/कर्मचाऱ्यांची ज्येष्ठतासूची प्रत्येक वर्षी तयार करणे व प्रसिध्द करणे याबाबतचे सर्वंकष धोरण संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहे. त्यानुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील संचालक (माहिती),गट-अ(वरिष्ठ) या संवर्गाची दिनांक १.१.२०२१ ते दिनांक १.१.२०२३ पर्यंतच्या अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भ क्र. ३ येथील परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेली आहे. सदर संवर्गात दिनांक १.१.२०२१ ते दिनांक १.१.२०२३ या कालावधीत अधिकाऱ्यांची नियमित पदोन्नती, सरळसेवा वा अन्य विहित मार्गाने नियुक्ती करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या नावाचा समावेश करुन तसेच नियतवयोमानाने सेवानिवृत्त, स्वेच्छा सेवानिवृत्ती घेतलेल्या अधिकाऱ्यांची नावे वगळून नियमित पदोन्नती मिळालेल्या अधिकाऱ्यांचा परिशिष्ट - अ मध्ये समावेश करुन दिनांक ०१.०१.२०२४ पर्यंतची तात्पुरती ज्येष्ठतासूची तयार करण्यात आली असून सदर जेष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडली आहे.

२. सदर ज्येष्ठतासूच्या ह्या संचालक (माहिती),गट-अ(वरिष्ठ) संवर्गातील तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या असल्याने दि.१.१.२०२३ पर्यत सेवानिवृत्त व वरिष्ठ संवर्गात पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांची नावे सदर सेवा ज्येष्ठतायादीतून वगळून दिनांक ०१.०१.२०२४ ची ज्येष्ठतासूची यासोबतच्या परिशिष्ट-“अ” नुसार प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास कळविण्यात येते की, सदर परिपत्रक सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे व तसे कळविल्याबाबत त्यांची स्वाक्षरी घेतलेली प्रत अभिलेखात ठेवावी. सदर ज्येष्ठतासूचीत काही वास्तविक चुका अथवा त्रुटी राहिल्या असतील तर त्याबाबत संबंधितांचे आक्षेप **दि.०३.०६.२०२४** पर्यंत मागवून घेऊन ते महासंचालनालयाच्या स्तरावर तपासून महासंचालनालयाच्या अभिप्रायांसह **दि.०४.०७.२०२४** पर्यंत शासनास पाठवावेत. सदर दिनांकानंतर शासनास प्राप्त झालेल्या आक्षेपांचा विचार केला जाणार नाही अशा सूचना संबंधितांना द्याव्यात. **दि.०४.०७.२०२४** पर्यंत कोणतेही आक्षेप शासनास प्राप्त न झाल्यास संबंधितांचा काहीही आक्षेप नाही असे गृहीत धरुन ज्येष्ठता सूची अंतिम करण्यात येईल याची कृपया नोंद घ्यावी.

४. उपरोक्त ज्येष्ठता सुची ही सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये व संचालक (माहिती) गट-अ ( वरिष्ठ ) या संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांना सदर ज्येष्ठतासूचीच्या प्रती शासनाच्या संकेत स्थळावरुन उपलब्ध करुन घेण्याबाबत कळवावे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०५२९१५१९०१७१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.05.29 15:32:17 +05'30'

**(विजय नांदेकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, ( मा.व ज. ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ३२,
३. संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. निवड नस्ती.

# परिशिष्ट तीन

**१)** संवर्गाचे नाव :- संचालक (माहिती), गट-अ

**२)** वेतनश्रेणी :- एस-२५ : ७८८००-२०९२००

**३)** दि. १ जानेवारी, २०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची (दि.०१.०१.२०२३ ते दि.३१.१२.२०२३ या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची )

| नियम ३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव / कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नाव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | नियम ३(२)(अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रूजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता (ज्या पदांसाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना अंतर्भूत करावा.) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (०१) | (०२) | (०३) | (०४) | (०५) | (०६) | (०७) | (०८) | (०९) | (१०) |
| | **खंड दिनांक १.१.२०१८ ते ३१.१२.२०१८** | | | | | | | | |
| ०१ | श्री. हे. का. बागुल | सरळसेवा | ५. ६. १९७३ | खुला | १८.९.२०१८ | १८.९.२०१८ | ३०.६.२०३१ | | शासन निर्णय क्र. मलोआ-२०१८/५६९/प्र.क्र.१३८/३४-अ, दि.१८.९.२०१८ अन्वये सरळसेवेने नियुक्ती |
| **खंड दिनांक १.१.२०१९ ते ३१.१२.२०१९** | | | | | | | | | |
| **खंड दिनांक १.१.२०२० ते ३१.१२.२०२०** | | | | | | | | | |
| ०२ | श्री.ग.श्री.रामदासी | तात्पुरती पदोन्नती | २९.३.१९६६ | खुला | ०१.९.२०२० | ०१.९.२०२० | ३१.३.२०२४ | | शासन निर्णय क्र. माजम-२०२०/प्र.क्र.९५/३४-अ, दि.३०.३.२०२१ अन्वये दि.०१.९.२०२० पासून तात्पुरती पदोन्नती . |
| | **खंड दिनांक १.१.२०२१ ते ३१.१२.२०२१** | | | | | | | | |
| | निरंक | | | | | | | | |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | **खंड दिनांक १.१.२०२२ ते ३१.१२.२०२२** | | | | | | | | |
| | निरंक | | | | | | | | |
| | **खंड दिनांक १.१.२०२३ ते ३१.१२.२०२३** | | | | | | | | |
| ०३ | श्री. किशोर गांगुर्डे | सरळसेवा | १४.०६.१९७८ | अ.जा. | १७.०२.२०२३ | १७.०२.२०२३ | ३०.०६.२०३६ | | शासन निर्णय क्र.मावज-२०२३/१११/प्र.क्र.१६/३४-अ, दि.१४.०२.२०२३ अन्वये सरळसेवेने नियुक्ती. |